

## भारतीय स्वयंशिक्षा पद्धती

# श्रीदत्तात्रेय यदु संवाद

### अर्थात श्री दत्तगुरूंचे २४ गुरू!

विद्यावाचस्पती प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११



जय गजानन.

या जगात कोणीही, कोणालाही, कुठेही, कधीही, काहीही शिकवू शकत नाही. मग आता आपण म्हणाल की शिक्षण यंत्रणेचे काय? तर या सर्व गोष्टी केवळ आणि केवळ शिक्षणाला सहाय्य करू शकतात. शिकवू शकत नाहीत. त्याचे महत्त्वपूर्ण कारण म्हणजे शिकवणे नावाची प्रक्रिया शक्य नाही. प्रक्रिया शिकणे अशीच असते. विद्यार्थ्याला शिकायची इच्छा असेल तर आणि तरच या सगळ्यांचा उपयोग असतो. ती इच्छाच नसेल तर हे सर्व निरर्थक आहे आणि इच्छा असेल तर कुठूनही शिकता येते.

शिक्षण ही घेणाऱ्याच्या दृष्टीने आत्मकेंद्रित व्यवस्था आहे. खऱ्या अर्थाने स्वयंशिक्षण हीच प्रक्रिया आहे. याच स्वयंशिक्षा पद्धतीची भारतीय भूमिका म्हणजे श्री दत्तात्रेय आणि महाराज यदू यांचा संवाद. भारतीय संस्कृतीचा अलौकिक ग्रंथ असणाऱ्या श्रीमद् भागवत महापुराणाच्या एकादश स्कंधात सात, आठ आणि नऊ अध्यायात हा अत्यंत दिव्य संवाद आलेला आहे. यापूर्वी सहाव्या अध्यायात या संवादाची पार्श्वभूमी सविस्तर वर्णन करण्यात आली आहे.

भगवान श्रीकृष्ण या पृथ्वीवर अवतीर्ण झाल्यानंतर त्यांचे जीवन प्रयोजन आणि कार्य संपूर्ण झाले आहे, असे पाहून सर्व देवता ब्रह्मदेवांच्या नेतृत्वात भगवंतासमोर आल्या. सज्जनांचे रक्षण, दुष्टांचे निर्दालन आणि धर्माची स्थापना हे आपले अवतार कार्य संपन्न झाले असून, त्यासाठी आपण या यादव वंशात धारण केलेला अवतार पूर्ण करून स्वधामी परतण्या विषयी त्यांनी भगवंताची प्रार्थना केली.

भगवान श्रीकृष्ण त्यांना म्हणतात की, बाकी सर्व कार्य पूर्ण झाले आहे फक्त आपल्या शक्तीने आणि वैभवाने उन्मत्त झालेला माझा हा यादव वंश निरंकुश झाला असल्याने भविष्यात तो विश्वाला घातक ठरेल. मिळालेल्या शापानुसार त्याचा विनाश झाला की मी हा अवतार संपवेल.

भगवान श्रीकृष्ण आपला अवतार संपवणार या कल्पनेने अत्यंत दुःखी झालेले भक्तराज उद्धव भगवंताच्या जवळ येतात. ते भगवंताला प्रार्थना करतात की आपल्या शिवाय मी क्षणभर देखील राहू शकत नाही मला देखील आपल्या सोबत वैकुंठात न्यावे. त्यावेळी भगवान त्यांना सांगतात की, मी ही पृथ्वी सोडून गेलो की सातव्या दिवशी द्वारका नगरीला समुद्र गिळंकृत करेल. कलियुगाला आरंभ होईल. सर्वत्र अधर्माचे साम्राज्य पसरेल. सर्व यादव प्रभास क्षेत्राला गेले आहेत. हे उद्धवा तू आता मन आणि बुद्धी मला अर्पण करून शास्त्रशुद्ध आचरण करीत या पृथ्वीवर राहावे. उद्धवांनी प्रार्थना केली की भगवन! आपल्या विरहात या पृथ्वीवर एक क्षणही राहण्याची इच्छा नाही. आपले मार्गदर्शन नसेल तर या जगात आम्ही कसे जगायचे? त्यावर भगवान समजावून सांगतात की या जगात आपला उद्धार आपणच करायचा असतो. जोपर्यंत भक्ताला स्वतःच्या उद्धाराची आस नसते तोपर्यंत मी सुद्धा त्याला काही करू शकत नाही. उद्धरेदात्मनात्मानम्! हेच वास्तव आहे.

जीवाच्या उद्धाराचा मार्ग आहे शिक्षण अर्थात संस्कार. प्रत्येक गोष्टीतून सकारात्मक संस्कार स्वीकारण्याची सवय लागली की व्यक्तीचे आयुष्य कायम आनंद रूप होते. ही वृत्ती नेमकी कशी असते आणि ती आपल्या ठिकाणी कशी जोपासावी? प्रत्येक गोष्टीकडे पाहण्याची सुयोग्य दृष्टी कोणती आणि त्यातून आपणास कसा बोध प्राप्त होतो हे सर्व सांगण्यासाठी भगवान श्रीकृष्ण उद्धवाला अवधूत अर्थात भगवान श्री दत्तात्रेय आणि महाराज यदु यांचा प्राचीन संवाद सांगत आहेत.

क्रमशः




भगवान श्रीकृष्णांच्या चरणी आलेल्या उद्धवाला या घोर कलियुगामध्ये सुखाने, शांतीने, समाधानाने जगण्याचा उपदेश करीत असताना भगवान श्रीकृष्णांनी त्याला आपले पूर्वज असणाऱ्या महाराज यदु आणि भगवान दत्तात्रेय यांचा संवाद सांगायला सुरुवात केली.

त्या संवादाची पार्श्वभूमी सांगताना ते म्हणतात की धर्मशास्त्राचे जाणकार महाराज यदु यांना एकदा एक अत्यंत शांत, प्रसन्न, तरुण असे अवधूत दिसले. त्यांनी अवधूतांच्या अवस्थेचे वर्णन करून त्या शांतीचे रहस्य त्यांना विचारण्यास सुरुवात केली.

महाराज यदू यांनी केलेली ही विचारणाच मोठी चिंतनीय आहे. त्यातून महाराज यदुंची गुणग्राहकता आणि त्यांना आयुष्यात अपेक्षित असणारी फलप्राप्ती सहज समोर येते. ते अवधूतांना म्हणतात आपण अत्यंत शुद्ध बुद्धीचे परम विद्वान असे दिसत आहात, पण तरीही आपण एखाद्या बालकासमान निरलस स्वरूपात विहार करीत आहात.

अर्थात माणसाच्या जीवनात तपस्या, ज्ञान, तेजस्विता या गोष्टी असाव्यातच पण त्याने त्याच्या जीवनात ताठरता, रुक्षता येता उपयोगी नाही. बालकाची निरागस अवस्था हेच खरे भाग्य होय. आयुष्य असेच शैशवास जपणारे असायला हवे.

महाराज यदु म्हणतात आयुष्य, (आरोग्य संपन्नता) यश, पैसा अशा कोणत्या ना कोणत्या तरी इच्छेने माणूस धर्म, अर्थ, काम, मोक्ष या पुरुषार्थांना प्रवृत्त होत असतो. मात्र आपल्यामध्ये यापैकी कशाचीही आस दिसत नाही.

आपण कर्म करण्यामध्ये समर्थ, विद्वान आणि निपुण आहात.पण तरीही आपण कोणतेही कर्म न करता शांत बसून आहात. हे महाराज यदुंचे वाक्य फार महत्त्वाचे आहे. ही शांती असाहाय्यतेतून, क्षमता हीनतेतून आलेली नाही. शक्ती असून त्याचा उपयोग न करणे हा भाव फार महत्त्वाचा आहे. ही शांती नाईलाज नाही तर स्वीकृती आहे. काही मिळवायचेच नसल्यामुळे असलेली शांतता आहे.

त्या शांतीला उपमा देताना महाराज यदु म्हणतात, हे सगळे जग काम, क्रोध, लोभाने जळत आहे पण आपली शांती मात्र सगळ्या जंगलाला आग लागल्यानंतर गंगेच्या डोहात शांत उभ्या असलेल्या गजराजा प्रमाणे भव्योदात्त वाटत आहे.



आजूबाजूच्या कोणत्याच अशांतीचा, अपेक्षांचा, आसक्तीचा आपल्याला स्पर्शही झालेला दिसत नाही. ही शांती आपण कशी प्राप्त केली?

महाराज यदूंच्या या प्रश्नातच प्रश्नकर्त्याची अपेक्षा आणि या संवादाचे फळ व्यक्त केले गेले आहे. सुख, शांती, समाधान हेच फळ आहे. मानवी जीवनाचे गंतव्य, ध्येय आहे. एक सम्राट जेव्हा हा प्रश्न विचारतो तेव्हा त्यातून अर्थ प्रगटतो की जगातील साधनसामुग्रीने या गोष्टी मिळत नाहीत. त्याच्याजवळ सुखाची सर्व साधने आहेत पण सुख नाही म्हणूनच सुखरूप असणाऱ्या अवधूतांच्या चरणी तो प्रार्थना करीत आहे.तो अद्वितीय मार्ग भगवान दत्तात्रेय कसा प्रकाशित करतात, ते पुढे.....



भारतीय स्वयंशिक्षा पद्धती

# श्रीदत्तात्रेय यदु संवाद

## अर्थात श्री दत्तगुरूंचे २४ गुरू !

### भाग ३

विद्यावाचस्पती प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

परम शांत , प्रसन्न अशा अवधूत श्री दत्तात्रेयांना पाहिल्यानंतर ज्यावेळी महाराज यदूने त्यांना त्या शांतीचे रहस्य विचारले, त्यावेळी भगवान दत्तात्रेय म्हणतात...

संति मे गुरवो राजन्
बहवो बुद्ध्युपाश्रिताः
यतो बुद्धिमुपादाय
मुक्तोऽटामीह ताञ्छृणु !

हे राजा माझे अनेक गुरु आहेत. त्यांच्याकडून मी बुद्धी प्राप्त केली. अर्थात शिक्षा स्वीकारली. ज्या बुद्धीला अर्थात ज्ञानाला प्राप्त केल्यामुळे मी या जगामध्ये मुक्त स्वरूपात विहरण करतो.

आपले हे विविध गुरु कोणते आहेत ते सांगताना भगवान दत्तात्रेय म्हणतात...

पृथ्वी वायुराकाश-
मापोऽग्निश्चन्द्रमा रविः
कपोतोऽजगरः सिन्धुः
पतो मधुकृत् गजः !!
मधुहा हरिणो मीनः
पिला कुररोऽर्भकः
कुमारी शरकृत् सर्प
ऊर्णनाभिः सुपेशकृत् !!

श्रीमद्भागवत ११/७/३३-३४

भगवान दत्तात्रय म्हणतात, १) पृथ्वी २) वायू ३) आकाश ४) जल ५) अग्नी ६) चंद्र ७) सूर्य ८) कबूतर ९) अजगर १०) समुद्र ११)पतंग १२) मधमाशी १३) हत्ती १४)मध गोळा करणारा १५) हरीण १६) मासोळी १७) पिंगला नावाची वेश्या १८)कुरर पक्षी १९) बालक २०) कुमारी कन्या २१) बाण बनवणारा २२) सर्प २३जाळे विणणारा कोळी आणि २४) भृंगी नावाचा कीटक अशा २४ जणांना मी आयुष्यात गुरु केले आहे. ही सूची विविध दृष्टीने महत्त्वाची आहे. त्यांच्याकडून काय शिकलो? हे तर पुढे संवादात विस्तृतपणे येणारच आहे पण त्यापूर्वी काही महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे आपल्या डोक्यात बसलेल्या गुरु या रूढ कल्पनेला येथे थारा नाही.

या गुरूंमध्ये कोणीही संत महात्मे पीठाधीश नाहीत. या २४ मध्ये पिंगला वेश्या, बालक, कुमारी कन्या, बाण बनवणारा आणि मध गोळा करणारा हे पाच सोडले तर बाकी मनुष्य देखील नाहीत. मानवी देहातील हे पाच देखील सामान्यतः गुरु पदावर कोणी आरुढ करेल असे नाही.

त्यात कबूतर साप हत्ती अजगर इत्यादी पशुपक्षी आहेत. भृंगी, मधमाशी, कोळी इत्यादी कीटक आहेत. तर पंचमहाभूते सूर्य चंद्र इत्यादी भौतिक गोष्टी आहेत. अर्थात सामान्य जीवांच्या लौकिक दृष्टीने गुरु म्हणून ज्यांच्याकडे पाहावे असे कोणी नाही कारण मुळातच भगवान दत्तात्रेय अलौकिक असल्याने त्यांचे गुरुदेखील तसेच अलौकिक आहेत.

जो जो जयाचा घेतला गुण
तो तो गुरु म्या केला जाणं
गुरुसी आलें अपारपण
जग संपूर्ण गुरू दिसे !

अशा शब्दात शांतिब्रह्म श्री एकनाथ महाराजांनी श्री दत्तप्रभूंची भूमिका अधोरेखित केली आहे.



शिक्षा वृत्तिभिरेतेषामन्वशिक्षमिहात्मनः ! अशी आपली भूमिका स्वतः श्री दत्तात्रेय सांगतात.

अर्थात यांच्याकडून मी त्यांची वृत्ती स्वीकारली. त्यांच्या गुणांचे ग्रहण केले. तथा त्याद्वारे स्वतःला शिक्षित केले. एकदा अशा स्वरूपात समोरच्याकडून शिकण्याची तयारी असली की संपूर्ण जग गुरु होते ही व्यापक भूमिका किती चिंतनीय आहे. यातील ही 'स्वतःला शिक्षित केले' ही भूमिका सगळ्यात महत्त्वाची आहे. त्यासाठी आपण या संवादाला भारतीय स्वयंशिक्षा पद्धती असे म्हणत आहोत. हे सर्व त्यांनी 'मला शिकवले 'असे श्री दत्तात्रेय म्हणत नाहीत. ते म्हणतात त्यांच्यापासून 'मी हे शिकलो'. भगवान दत्तात्रेय या प्रत्येक गुरूंकडून काय शिकले ? त्यांनी कोणते गुण ग्रहण केले आणि स्वतःला अवधूत अवस्थेप्रत नेले याचा विचार पुढे क्रमशः करू.






भगवान श्री दत्तात्रेय यांनी आपल्या गुरुपरंपरेच्या मालिकेत पहिले स्थान भूमातेला दिले आहे. पृथ्वी नामक आपल्या या श्री गुरूकडून आपण काय शिकलो? हे सांगताना श्री दत्त महाराज म्हणतात,

**भूतैराक्रम्यमाणोऽपि धीरो दैववशानुगैः**
**तद्विद्वान्न चलेन्मार्गा- दन्वशिक्षं क्षितेर्व्रतम्**

११-७-३७

पृथ्वीचा अत्यंत महत्त्वाचा गुण आहे क्षमा. संस्कृत भाषेमध्ये पृथ्वीसाठी जे अनेक शब्द आहेत त्यामध्ये क्षमा असाच एक शब्द आहे. तिच्यावर असणारी विविध भूत अर्थात निर्माण झालेले सचेतन अचेतन पदार्थ तिच्यावर वेगवेगळ्या प्रकारे आक्रमण करतात.

आपण त्या पृथ्वीला खोदून आपल्याला पाहिजे तसे मार्ग बनवतो. तिला नांगरून शेती करतो. तिला अक्षरशः छिद्र पाडून त्यातून जल प्राप्त करतो. केवळ मनुष्यच नव्हे तर विविध प्राणी वेगवेगळ्या पद्धतीने तिला उकरणे स्वरूपात त्रास देतात. तिच्यावर वेगळ्या अर्थाने हे आक्रमण असते. मात्र यापैकी कोणत्याही आक्रमणाने ती कधी व्यथीत होत नाही किंवा त्यांना कधी त्यापासून परावृत्त करीत नाही.

ज्याप्रमाणे एखादे लहान लेकरू आईलाच त्रास देते. तिचे केस ओढते. कान, नाक ओढते. तिच्या अंगावर हात पाय मारते. वेळ पडल्यास चावते. अंगावर मलमूत्र त्याग करते. पण जशी ती माता आपल्या त्या मुलाच्या कोणत्याही गोष्टीने प्रक्षुब्ध होत नाही त्याचप्रमाणे सर्व जीवांच्या त्रासाला भूमी सहन करत असल्यामुळेच तिला भारतीय संस्कृती भूमाता असे म्हणते.

भगवान दत्तात्रेय म्हणतात विद्वान व्यक्तीने देखील समोरच्यांच्या क्रियांच्या बद्दल अशीच शांत आणि अविचल भूमिका धारण करावी हे मी पृथ्वीकडून शिकलो.

आपल्या भूमिकेला पुढे सांगताना ते म्हणतात..

**शश्वत्परार्थसर्वेहः परार्थैकान्तसम्भवः**
**साधुः शिक्षेत भूभृत्तो नगशिष्यः परात्मताम्**

११-७ -३८

स्वतः पृथ्वीच अशी वागते असे नाही तर त्या पृथ्वीतून निर्माण होणारी प्रत्येक गोष्ट अशीच अनुकरणीय आहे हे सांगताना भगवान दत्तात्रेय नग शब्द वापरतात. जो जागचा हलू शकत नाही तो न-ग असा त्याचा अर्थ आहे. तो शब्द सामान्यतः पर्वतांसाठी योजिला जात असला तरी त्यात वृक्ष हा अर्थ देखील अपेक्षित आहे. वृक्ष देखील जागचा हलत नाही.

अशी पृथ्वीतून निर्माण झालेले नग म्हणजे पर्वत, वृक्ष देखील कायम परार्थासाठीच कार्यरत असतात याकडे भगवान लक्ष वेधतात. वृक्ष आणि पर्वत स्वतः ऊन, वारा ,पाऊस सर्व सहन करीत सदैव सगळ्यांच्या जगण्याचा आधार होतात. त्याप्रमाणे साधूचे जीवन देखील परोपकारासाठीच असले पाहिजे. वेगळ्या शब्दात असे परोपकारासाठी ज्याचे जीवन आहे त्यालाच साधू म्हणावे असेच भगवंत दत्तात्रेय यातून सांगत आहेत.

नग म्हणताना पर्वत हा निर्जीव आहे आणि वृक्ष सजीव असला तरी हालचाल करण्यास असमर्थ आहे. मात्र असे असले तरी त्यांचे जीवन परोपकारसाठी आहे . ते निर्जीव असून परोपकार करतात मग माझ्या ठिकाणी तर त्यांच्यापेक्षा अधिक संभावना, शक्ती आहेत. त्यामुळे माझे जीवन तर अखंड परोपकारासाठीच असायला पाहिजे हेच श्रीदत्तप्रभू अधोरेखित करतात.

क्षमाशीलता आणि परोपकार या गुणांनी युक्त असणारा आणि त्या गुणांची शिकवण देणारा श्री दत्तप्रभूंचा पहिला गुरु आहे भूमाता.

... साप्ता. स्वदेश ...



भारतीय स्वयंशिक्षा पद्धती

# श्रीदत्तात्रेय यदु संवाद

## अर्थात श्री दत्तगुरूंचे २४ गुरू !

### भाग ५

विद्यावाचस्पती प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११



भगवान दत्तात्रेय आपल्या गुरूच्या मालिकेत पृथ्वीला पहिला गुरु सांगितल्यानंतर दुसऱ्या गुरू रूपात वायूचे वर्णन करीत आहेत.

आपल्या जीवनातील वायूचा पहिला संबंध म्हणजे प्राणवायू. शरीराचे संचालन करणाऱ्या या शरीरांतर्गत प्राणवायू पासून वायू तत्त्वाचा विचार सुरू करताना ते म्हणतात,

प्राणवृत्त्यैव संतुष्येन् - मुनिर्नैवेन्द्रियप्रियैः !
ज्ञानं यथा न नश्येत नावकीर्येत वाङ्मनः !!
११-७-३९

अर्थात या प्राणवायूला स्वकार्यासाठी, संचालनासाठी अन्नग्रहण करणे आवश्यक आहे. जिवंत राहण्यासाठी अन्न अनिवार्यच आहे. पण ते तेवढेच घ्यावे जेवढे अत्यावश्यक आहे. अधिक अन्न ग्रहण केले तर त्यानेच तो प्राण कासावीस होतो. अपचनाने त्रस्त होतो. त्याचप्रमाणे साधकाने देखील जीवनात काही उपभोग घेणे अनिवार्य आहे. मात्र ते अधिक प्रमाणात घेतले किंवा घेण्याची इच्छा केली तर त्यातून निर्माण होणाऱ्या अहंकाराच्या अपचनाने ज्ञान नष्ट होते. त्यामुळे भगवान दत्तात्रेय सांगतात वायु प्रमाणे अत्यावश्यक भोगांचाच आधार घ्यावा. आपली वाणी आणि आपले मन आपल्या निश्चित ध्येयापासून विचलित होणार नाही याचे भान सदैव जागृत असायला हवे. अन्यथा जीवनाचा आधार असणारे अन्नच व्याधीचे कारण होते हे मी प्राणवायू कडून शिकलो.

आता वायु तत्वाचे समष्टी स्वरूपात व्यापक चिंतन करताना ते म्हणतात,

विषयेष्वाविशन् योगी नानाधर्मेषु सर्वतः !
गुणदोषव्यपेतात्मा न विषज्जेत वायुवत्!!
११-७-४०

या सृष्टीमध्ये प्रवाहित वारा अनेक ठिकाणी पोहोचतो. मात्र त्यापैकी कोणत्याही जागी तो आसक्त होत नाही. एखाद्या सुंदर उद्यानात गेला तर तेथे रमत नाही किंवा अगदी स्मशानातून वाहिला म्हणून तेथून पाय काढत नाही. तो उद्यानाने हर्षितही होत नाही आणि स्मशानाने दुःखित देखील. अगदी त्याचप्रमाणे योग्याने देखील जीवनामध्ये विचरण करीत असताना प्रारब्धवशात ज्या कोणत्या गोष्टी समोर येतील त्या कोणत्याही गोष्टी प्रती स्वीकार वा त्यागाची वृत्ती न घेता विचारण करीत राहावे हे मी वायू कडून शिकलो.

वायूच्या यात्रेप्रमाणे आपल्या जीवन यात्रेमध्ये देखील विविध पदार्थांप्रमाणे विविध लोक प्राप्त होतात. यांच्या संगतीबाबत सांगताना भगवान दत्तात्रेय म्हणतात,

पार्थिवेष्विह देहेषु प्रविष्टस्तद्गुणाश्रयः!
गुणैर्न युज्यते योगी गन्धैर्वायुरिवात्मदृक् !!
११-७-४१

वायुला स्वतःचा असा कोणताही गंध नसतो. आपण जेव्हा सुगंधी वारा किंवा दुर्गंधी वारा असा शब्द वापरतो तेव्हा तो वारा ज्या पदार्थाच्या संगतीतून आलेला असतो त्या पदार्थाचा तो गंध असतो. काही काळ जरी वारा त्या गंधाचे वहन करीत असला तरी अल्पावधीतच वारा त्या सुगंधाला किंवा दुर्गंधाला देखील सोडून देतो. आपल्या मूळ गंधहीन अवस्थेला धारण करतो. त्याचप्रमाणे योग्याने देखील जीवन जगताना कोणत्याही गोष्टीच्या दोषांनाच नव्हे तर गुणांना देखील चिटकून राहता उपयोगी नाही हे भगवान दत्तात्रेय महाराज वायू कडून शिकले आहेत.

अत्यावश्यक तेवढेच ग्रहण, कोणत्याही परिस्थितीत आसक्त न होणे आणि कोणत्याही गुणदोषांनी लिप्त न होता आत्मस्वरूपात राहणे आणि अखंड प्रवाहित अर्थात चैतन्यशील असणे हाच शांती, समाधानाचा मार्ग आहे हे सांगणारा श्री दत्तगुरूंचा दुसरा गुरु आहे वायू.

... साप्ता. स्वदेश ...




भगवान दत्तात्रेय महाराज यदुला आपला तिसरा गुरु सांगताना आकाश नामक महान तत्वाचे विवेचन करीत आहेत.

आकाशाच्या एकत्वाचे आणि सर्व व्यापकत्वाचे वर्णन करताना ते म्हणतात,

अन्तर्हितश्च स्थिरज' मेषु
ब्रह्मात्मभावेन समन्वयेन
व्याप्त्याव्यवच्छेदमस' मात्माना
मुनिर्नभस्त्वं विततस्य भावयेत् !!

श्रीमद्भागवत ११-७-४२

सर्व स्थिर आणि जंगम अर्थात अचल आणि चल वस्तूंमध्ये आकाश एकत्वाने व्यापलेले असते. चार भिंतींचा अडथळा तयार झाल्यानंतर आपल्याला घरातील आकाश वेगळे असल्यासारखे वाटते त्यामुळे त्याला आपण मठाकाश असे म्हणतो. किंवा एखाद्या घड्याचा आकार तयार झाल्यानंतर त्याच्या आतील आणि बाहेरील आकाश वेगळे आहे असे आपल्याला भासते. त्या आतील आकाशाला आपण घटाकाश असे म्हणतो. मात्र वास्तविक विचार केला तर आतील किंवा बाहेरील असे कोणतेही आकाश नसते. आकाश हे केवळ आकाशच असते. काही काळापुरते त्या बाह्य उपाधींनी ते बाधित झाले असे वाटत असले तरी ज्या क्षणी ती उपाधी नष्ट होते त्या क्षणी ते आकाश पुन्हा एकत्व पावते.

अशाच स्वरूपात प्रत्येक जीवाच्या बाबतीत त्याच्या आत असणारे चैतन्य त्या त्या जीवाच्या देहाच्या द्वारे मर्यादित झाले असे वाटत असले तरी ते चैतन्य, तो परमात्मा सर्वत्र एकच आहे.
त्या स्वरूपात माळेतील सर्व मण्यांच्या आत एक स्वरूपात असणारे सूत्र जाणावे त्याप्रमाणे आकाशाप्रमाणे सर्व व्यापक असणारा परमात्मा समजून घ्यावा.

या आकाशाच्या अधिष्ठानावरच अन्य सर्व गोष्टी घडत असतात याचे विवेचन करताना भगवान दत्तात्रेय महाराज म्हणतात,

तेजोऽन्नमयैर्भावै - र्मेघाद्यैर्वायुनेरितैः
न स्पृश्यते नभस्तद्वत् कालसृष्टैर्गुणैः पुमान्!

११-७-४३

आकाशात मेघ गोळा होतात, मळभ दाटून येते, विजा कडाडतात, जलवर्षाव होतो, मात्र या कोणत्याही गोष्टीचा आकाशावर काहीही परिणाम होत नाही.



ज्याप्रमाणे एखाद्या चित्रपटाच्या पडद्यावर युद्ध होतात पण पडदा फाटत नाही. पूर येतात पण पडदा भिजत नाही. बॉम्बस्फोट होतात पण पडदा नष्ट होत नाही किंवा त्यावर घडणाऱ्या आनंददायी प्रसंगाचा देखील कोणताही प्रभाव मागे राहत नाही. त्याप्रमाणे ज्ञानी व्यक्तीने सर्व गोष्टींच्या प्रभावापासून दूर राहावे.

परम व्यापकता, सर्व अंतर्हितता आणि तरी सर्व गुणदोषांनी रहित असणे या गोष्टी शांती, सुख, समाधानाचा आधार म्हणून मी आकाशाकडून शिकलो असे भगवान दत्तात्रेय सांगत आहेत.

... साप्ता. स्वदेश ...



भारतीय स्वयंशिक्षा पद्धती

# श्रीदत्तात्रेय यदु संवाद

## अर्थात श्री दत्तगुरूंचे २४ गुरू !

### भाग ७

विद्यावाचस्पती प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११



एक गुरु शिष्य प्रवासाला निघाले. श्री गुरुंना तहान लागली. त्यांच्या आज्ञेने शिष्य पाणी आणायला गेला. पण पाणी गढूळ होते. कोणता तरी प्राणी पाण्यातून पुढे गेला होता. शिष्याने विचारले मी काय करू? श्री गुरुंनी शिष्याला १० माळा जप करायला सांगितला. गंमत म्हणजे त्यानंतर पाणी स्वच्छ झाले होते. शिष्याला आश्चर्य वाटले तो म्हणाला मी तर काहीच केले नाही. मग पाणी कसे स्वच्छ झाले? श्री गुरु म्हणाले तू काही केले नाही, म्हणूनच पाणी स्वच्छ झाले. स्वच्छ असणे हा त्याचा स्वभाव आहे.

पाण्याच्या या आणि अशाच गुणधर्मांचा विचार करता भगवान श्री दत्तात्रेय जलाला गुरू करतात. ते म्हणतात,

स्वच्छः प्रकृतितः स्निग्धो
माधुर्यस्तीर्थभूर्नृणाम्!
मुनिः पुनात्यपां मित्र-
मीक्षोपस्पर्शकीर्तनैः !!
भागवत ११-७-४४

पाणी स्वभावतः स्वच्छ आहे. स्निग्ध आहे. गोड आहे. लोकांच्यासाठी तीर्थ स्वरूप आहे.

बाह्य या गोष्टी त्याला गढूळ करतात. पण तो प्रभाव संपताच ते पुन्हा मूळची शुद्धता धारण करते. ते शीतल आहे. अग्नीचा किंवा उन्हाच्या संपर्कानि ते काही काळ गरम वाटू शकते. पण तो संपर्क संपला की ते पुन्हा थंड होते. शीतलता हा त्याचा स्वभाव आहे.

जल स्निग्ध आहे. प्रेमळ आहे. आनंद देणारे आहे. त्यामुळेच तर पहा ना प्रचंड थकवा आल्यानंतर चेहऱ्यावर केवळ पाण्याचा शिडकावा केला तरी बरीच प्रसन्नता परत येते. ते स्वतः प्रसन्न आहे. इतरांना प्रसन्नता देणारे आहे.

जल स्वभावतः मधुर आहे. भारतीय संस्कृतीची ही विज्ञान निष्ठा समजून घ्या. त्यांनी पाण्याची चव मधुर आणि रंग पांढरा सांगितला. आपल्याला शाळेत शिकविले गेले की पाण्याला ना चव असते ना रंग.

पण वास्तविकता तशी नाही. पहिले आवळा खाऊन त्यावर पाणी प्या म्हणजे पाण्याची गोड चव कळते. पाण्याचा धबधबा होताना किंवा बर्फ होताना जो पांढरा रंग तयार होतो तो बाहेरून टाकलेला नसतो. तो त्याचा स्वतःचाच असतो. जल मधुर आणि शुभ्र आहे हे भारतीय कथन अधिक विज्ञाननिष्ठ आहे.

पाण्याचे खरे महत्त्व तेव्हाच आहे जेव्हा ते तीर्थ होते. नालीत जाणे, अधोगतीत होणे हा जरी स्वभाव असला तरी त्या अधोगतीत जल तिरस्काराचा विषय ठरते. मात्र ते गंगेत गेले तर वंदनाचा विषय ठरते. जीवनात संगती अशीच आवश्यक असते हेच ते 'जीवन' आपल्यासमोर स्पष्ट करते.

महाराज यदूंना उपदेश करताना भगवान दत्तात्रेय म्हणतात मुनी अर्थात शांती प्रिय व्यक्तीने असेच जलासारखे असावे.

जलाला जीवन म्हणणारी भारतीय संस्कृती याचसाठी वंदनीय ठरते. आपले जीवन देखील जीवनवत असावे. स्वच्छ असावे, शांत असावे, शीतल असावे, मधुर असावे, प्रवाहित असावे आणि इतरांना आनंद देणारे असावे. आपल्या आयुष्याची नाली होऊ नये. गंगा व्हायला हवी. जिच्या दर्शनाने, स्पर्शाने अथवा केवळ नामोच्चारणाने समोरचा पवित्र होतो.भगवान दत्तात्रेय म्हणतात जला कडून मी हे शिकलो आणि म्हणूनच त्यांच्या नामोच्चारणाने आपण स्वतःला धन्य समजतो. मग त्या दत्तप्रभूंचे वंदन करताना शांतिब्रह्म एकनाथ महाराजांचे चे शब्द प्रगटतात,

दत्त दत्त ऐसे लागले ध्यान
हरपले मन झाले उन्मन
मी तू पणाची झाली बोळवण
एका जनार्दनी श्री दत्त ध्यान !!

... साप्ता. स्वदेश ...

भारतीय स्वयंशिक्षा पद्धती

# श्रीदत्तात्रेय यदु संवाद

## अर्थात श्री दत्तगुरूंचे २४ गुरू !

### भाग ८



विद्यावाचस्पती प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११



भगवान दत्तात्रेय आपल्या पुढच्या गुरुच्या स्वरूपात अग्नी देवाचे वर्णन करतात.

त्याचे स्वरूप सांगताना ते म्हणतात,

तेजस्वी तपसा दीप्तो
दुर्धर्षोदरभाजनः !
सर्वभक्षोऽपियुक्तात्मा
नादत्ते मलमग्निवत् !!

११-७- ४५

अर्थात अग्नी जसा तेजस्वी असतो जसा आपल्या ज्योतिर्मय स्वरूपाने तळपत असतो तसाच साधक असायला हवा. दुसऱ्या कोणत्याही तेजाने म्हणजे दिवा किंवा मशालीच्या प्रकाशाने अग्नीचे तेज जसे दाबले जात नाही तसा साधक कोणाच्या प्रभावाने म्लान होणारा नसावा.

ज्याप्रमाणे अग्नीमध्ये काहीही टाकल्यावर त्या सगळ्या गोष्टींना तो जाळून टाकतो पण त्यातल्या कोणत्याही वाईट गोष्टींचा दोष त्याला लागत नाही त्याप्रमाणे जीवनात समोर आलेल्या कोणत्याही विकारांचा परिणाम आपल्यावर न होऊ देणे ही गोष्ट अग्नी कडून शिकण्यासारखी आहे.

क्वचिच्छन्नः क्वचित् स्पष्ट
उपास्यः श्रेय इच्छिताम्!
भुक्ते सर्वत्र दातृणां
दहन् प्रागुत्तराशुभम्!!

जसा मी काही जागी अदृश्य असतो तर काही जागी स्पष्ट तसे साधकाने सुद्धा असावे. अर्थात योग्य जागीच प्रगट व्हावे. व्यक्त व्हावे. अयोग्य विषयात अदृश्य असलेलेच बरे.

ज्याप्रमाणे पडलेली प्रत्येक गोष्ट अग्नी खाऊन टाकतो त्याप्रमाणे साधकाने भूत आणि भविष्य काळातील कर्म फळांना दग्ध करावे. अर्थात या कर्मफळाच्या आसक्तीत अडकू नये. जसा अग्नी कितीही मिळाले तरी पूर्वी मिळाले नाही म्हणून हळ-हळू जळत नाही किंवा भविष्यात मिळाले नाही तर सोय असावी म्हणून काही साठवून ठेवत नाही.

स्वमायया सृष्टमिदं
सदसद्लक्षणं विभुः
प्रविष्ट ईयते तत्तत्
स्वरूपोऽग्निरिवैधसि!!

११-७-४७

अग्नी ज्या प्रकारच्या लाकडाला किंवा वस्तूला स्पर्श करतो त्या वस्तूचा आकार धारण करतो. वास्तविक तो वेडा वाकडा आकार त्या काडीचा असतो अग्नीचा नाही. त्याप्रमाणे ज्या परमात्म्याने हा संपूर्ण संसार आपल्या मायेने निर्माण केला त्या प्रत्येक जागी भासत असलेला परमात्मा हा या बाह्य पदार्थांच्या उपाधीने युक्त नसून या सगळ्यांच्या पलीकडे मूळ स्वरूपात तो आकार भिन्न आहे हे अग्नीच्या दर्शनातून समजून घ्यावे.

अर्थात तेजस्वी तपस्वी असणे, मिळणाऱ्या कोणत्याही भोगाचा लेप न लागू देणे, सर्व गोष्टी घेऊनही अंतरी शुद्ध असणे हे अग्नी कडून घेण्याचे गुण आहेत तर उपाधीनुसार तो प्रगट होत असला तरी तो त्या सगळ्यांच्या पेक्षा वेगळा आहे अशा स्वरूपात परब्रह्म तत्वाची जाणीव अग्नी करून देतो हे अग्नीचे गुरुतत्त्व आहे.'

... साप्ता. स्वदेश ...



भारतीय स्वयंशिक्षा पद्धती

# श्रीदत्तात्रेय यदु संवाद

## अर्थात श्री दत्तगुरूंचे २४ गुरू !

### भाग ९

विद्यावाचस्पती प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

भगवान दत्तात्रेय आपल्या सहाव्या गुरुंच्या रूपात चंद्राचा गुणगौरव करीत आहेत. वास्तविक त्रिदेवांचे तीन अवतार स्वरूपात महर्षी दुर्वास, भगवान दत्तात्रेय आणि चंद्र अशा तिघांचे अवतरण झाले. त्यात चंद्र भगवान दत्तात्रयांपेक्षा लहान. पण शिकण्याची इच्छा असली की बालादपि सुभाषितं ग्रह्यम् ! या न्यायाने लहान व्यक्तीकडून देखील योग्य गुण स्वीकारता येतात हेच आपल्याला येथे पाहता येते.

चंद्राकडून घेतलेल्या बोधाचा विचार करताना ते म्हणतात...

विसर्गाद्या स्मशानांता माया देहस्य नात्मनः!

कलानामिव चंद्रस्य कालेनाव्यक्तवर्त्मना !!

काळाचा वर्त्म म्हणजे मार्ग हा अव्यक्त आहे अर्थात त्याची गती कळत नाही. या काळाच्या गतीनुसार चंद्राच्या कला कमी किंवा जास्त होतात.

मात्र चंद्राच्या या कला दिसणे हा आपला पृथ्वी सापेक्ष विषय आहे. आपल्या, चंद्राच्या आणि सूर्याच्या स्थानांमुळे आपल्याला त्या कला दिसतात प्रत्यक्षात चंद्र ना लहान होतो ना मोठा. हेच विज्ञान लक्षात ठेवत भगवान दत्तात्रेय म्हणतात विसर्ग म्हणजे जन्मापासून स्मशानापर्यंत म्हणजे समाप्तीपर्यंत जे बदल होतात ते देहाच्या बाबतीत असतात. तो वृद्धिंगत होतो किंवा क्षीण होतो. हा बदल आत्म्याच्या ठिकाणी होत नाही. जसा चंद्र कलेनुसार लहान किंवा मोठा झाला असे वाटले तरी वास्तविक त्याच्यात कोणताही बदल होत नाही. हा पाहणाऱ्याच्या दृष्टीचा भ्रम आहे तशीच देहाची अवस्था आहे. हीच माया आहे.

आपल्या विवेचनाला अधिक स्पष्ट करताना भगवान दत्तात्रय म्हणतात जशी अग्नीची प्रत्येक ज्वाला ही क्षणात प्रगट होत असते आणि क्षणात नष्टही होत असते.



मात्र त्या सर्व ज्वालांच्या मागे असणारा अग्नी अखंड असतो. त्याचप्रमाणे कालौघात प्राणी देह धारण करतात आणि सोडतात मात्र त्या सर्व देहांच्या आत असणारे आत्मतत्त्व सदैव अखंड असते.

विकास किंवा क्षय या दोन्ही अवस्था बाह्य स्वरूपातील आहेत आणि दोन्ही अशाश्वत आहेत हेच भगवान दत्तात्रेय चंद्राकडून शिकतात. चंद्राकडून हे शिकायला पाहिजे असे आपल्याला सांगतात.

... साप्ता. स्वदेश ...




भगवान श्री दत्तात्रेय आपल्या गुरु मालिकेतील सातव्या गुरूरूपात भगवान सूर्यांना अभिवादन करीत आहेत.

सूर्यो आत्मा जगतस्तस्थुषश्च! अशा रूपात वेदांत सूर्यांना वंदन करण्यात आले आहे. ते सर्व जगाचा आत्मा अर्थात जीवसृष्टीचे अधिष्ठान आहेत. त्या सूर्याचे वैभव वर्णन करताना आणि त्यांच्यापासून काय शिकलो? हे सांगताना भगवान दत्तात्रय म्हणतात,

गुणैर्गुणानुपादत्ते यथाकालं विमुञ्चति
न तेषु युज्यते योगी गोभिर्गा इव गोपतिः!

जसे भगवान सूर्य आपल्या दिव्य सूर्यकिरणांनी जलाचे ग्रहण करतात. आपल्या उष्णतेने त्या पाण्याची वाफ करून त्याचे ढगात रूपांतर करतात. आणि योग्य वेळी ते पाणी सोडून देतात अर्थात पाऊस देतात त्याप्रमाणे योग्याने ग्रहण देखील इतरांना देण्यासाठीच करावे. ज्याप्रमाणे सूर्य जलाचे ग्रहण करताना त्यात त्याचा स्वार्थ नसतो. ते पाणी योग्य वेळी दुसरीकडे देण्यासाठीच ग्रहण केलेले असते त्याचप्रमाणे साधकाने काही ग्रहण केले तरी ते इतरांना शांती, सुख प्रदान करण्यासाठी, नवजीवन फुलवण्यासाठी असावे हे भगवान सूर्याकडून शिकता येते.

भगवान दत्तात्रेय पुढे म्हणतात,

बुध्यते स्वे न भेदेन व्यक्तिस्थ इव तद्गतः
लक्ष्यते स्थूलमतिभिरात्मा
चावस्थितोऽर्कवत!!
भागवत ११-७-५१

अनेक भांड्यांमध्ये पाणी भरून ठेवल्यानंतर सूर्य उगवल्यावर त्या प्रत्येक भांड्यात सूर्याचे प्रतिबिंब पडते. मात्र अशा अनेक भांड्यात दिसणाऱ्या अनेक प्रतिबिंबांनी सूर्य अनेकत्व पावत नाही. सूर्य एकच असतो. पात्र सापेक्ष रीत्या प्रतिबिंब अनेक होऊ शकतात. मात्र बिंब एकच असते. त्याप्रमाणे असंख्य जीवांमध्ये जीव स्वरूपात जरी चैतन्य अनेकत्वाने जाणवत असले तरी मूलतः चैतन्य एकच आहे.



सर्व प्राणीमात्रांच्या ठिकाणी, सुख शांती इच्छिणाऱ्या साधूची दृष्टी समान असावी हे भगवान सूर्यांच्या माध्यमातून शिकता येते असेच भगवान दत्तात्रेय म्हणत आहेत. स्वीकृत गोष्टीत अनासक्ती आणि सर्वत्र समदर्शन हाच सुख शांती समाधानाचा मार्ग आहे हे भगवान दत्तात्रेय, भगवान सूर्याकडून शिकतात.

... साप्ता. स्वदेश ...



भारतीय स्वयंशिक्षा पद्धती

# श्रीदत्तात्रेय यदु संवाद

## अर्थात श्री दत्तगुरूंचे २४ गुरू !

### भाग ११

विद्यावाचस्पती प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११



भगवान श्री दत्तात्रेय आपल्या पुढच्या गुरुच्या रूपात कपोत अर्थात कबुतराचे वर्णन करीत आहेत. ते म्हणतात,

नातिस्नेहः प्रसङ्गो वा
कर्तव्यः कापि केनचित्
कुर्वन् विंदेत सन्तापं
कपोत इव दीनधी !!
भागवत ११-७- ५२

कधीही, कोणी, कोणासोबत अत्यधिक स्नेह किंवा प्र-संग (म्हणजे अत्यधिक आसक्ती) करू नये. केल्यास दीनधी कपोताप्रमाणे संताप प्राप्त होतो.

येथे भगवान दत्तात्रेयांनी त्या कबुतरासाठी दीनधी असा अत्यंत सुंदर शब्द वापरला आहे. दीन शब्दाचा अर्थ केवळ साधनसामुग्री नसणे एवढाच नाही तर असलेल्या साधनांचा उपयोग न करता येणे किंवा न करणे असा आहे.

येथे श्री दत्तात्रेय महाराज यदुला एक सविस्तर कथा सांगत आहेत. ते म्हणतात एका जंगलात एक कबूतर राहत होते. काही काळानंतर त्याला एक कबुतरी भेटली. दोघांमध्ये स्वाभाविक अत्यंत प्रेम निर्माण झाले.

कबूतर हे तसेही अत्यंत प्रेमी जीव म्हणून ओळखले जाते. सातत्याने एकमेकांच्या सोबत राहून गूटर्गु करण्याच्या प्रवृत्तीचे ते प्रतीक आहे. ही जोडी देखील अशीच एकमेकांच्या प्रेमात आकंठ बुडाली.

काही काळानंतर कबुतरी गर्भवती राहिली. त्यांनी तयार केलेल्या घरट्यात तिने दोन अंडी दिली. कालांतराने त्यातून दोन छोटी पिल्ले जन्माला आली.

आता स्वाभाविकच त्या दोघांचा अधिकाधिक काळ त्या मुलांच्या पालनातच जाऊ लागला. मुलांसाठी अन्न गोळा करण्याकरिता सर्व जंगलभर फिरावे लागत होते.

अशाच स्वरूपात काही काळ गेल्यानंतर एक पारधी त्या जंगलात येऊन पोहोचला. त्याने झाडाखाली जाळे लावले. त्यावर दाणे टाकले. नुकतीच उडायला शिकलेली पिल्ले दाण्याच्या मोहाने खाली आली आणि जाळ्यात अडकली.

पिल्लांकरता दाणे घेऊन परत आलेली कबुतरी ज्यावेळी आपल्या पिल्लांना अडकलेली पाहते त्यावेळी तिच्या दुःखाला पारावार राहत नाही. पिल्लांची तडफड आणि आरडाओरड पाहून मागचा पुढचा कोणताही विचार न करता ती त्यांच्या जवळ जाते आणि ती देखील जाळ्यात अडकते.

थोड्यावेळाने कबूतर परत येतो. दोन्ही पिल्लांना आणि जिच्यावर प्राणापलीकडे प्रेम केले त्या आपल्या पत्नीला असे जाळ्यात अडकलेले पाहून त्याची विचारक्षमताच जणू नष्ट होते. आता हे मारले जाणार. आपला आणि यांचा विरह होणार. ही कल्पनाच त्याला सहन होत नाही. यांच्याशिवाय जगून करायचे तरी काय? यांच्या विना कोणता आनंद मिळणार? अशा विचारात तो कबूतर देखील त्या जाळ्यावर जाऊन बसतो. फसतो.

याच कारणाने भगवान दत्तात्रेय त्याला दीनधी असा शब्द वापरत आहेत. वास्तविक जीवनात कबुतरी आणि पिल्ले नसताना देखील तो कबुतर सुखाने जगत होता. त्यांच्यासोबत त्याने आयुष्यात वेगवेगळी सुखे भोगली हे खरे आहे. पण त्यांना असे अडकलेले पाहिल्यानंतर बुद्धिमान असता तर त्याने त्यांना वाचविण्याचा प्रयत्न केला असता. किमान तसा प्रयास केला असता. मात्र त्या प्रेमाने त्याच्या बुद्धीवर असा काही पगडा टाकला की त्याऐवजी त्यांच्यासह तो देखील दुःखात जाऊन पडला.

अतिरेकी प्रेमामुळे विचारहीन अवस्थेत स्वतःचा विनाश करणाऱ्या या कबुतराकडे पाहून भगवान दत्तात्रेय म्हणतात, माणसाला मिळालेला हा देह मुक्तीचे साधन आहे. मात्र संगामध्ये अडकलेला जीव 'आरुढच्युत' होतो. अर्थात उन्नतीचा मार्ग सोडून अधः पतीत होतो.

त्यासाठीच ते म्हणतात कोणाशीही अत्यंत प्रेम किंवा संग करूनये हे मी कबुतरा पासून शिकलो.